**पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना आंबिया बहार सन २०१९-२० मध्ये राज्य हिस्साची रक्कम विमा कंपनीस वितरीत करण्यासाठी मंजुरी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः फवियो-२०१९/प्र.क्र.२०२/१०-अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३ ऑगस्ट, २०२०

वाचा -

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. फवियो-२०१९/प्र.क्र.२०२/१०- अे, दि.३१.१०.२०१९
२. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. फवियो-२०१९/प्र.क्र.२०२/१०- अे, दि.१.०१.२०२०
३. वित्त विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क.६५/अर्थ-३, दि.४/०५/२०२०
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.कृआ/मु.सां/पुहफपिवियो/अ.मा/१४७८८/२०२०, दि.२२.०६.२०२०

**प्रस्तावना :-**

शेतकऱ्यांच्या फळ पिकांना हवामान धोक्या पासुन विमा संरक्षण दिल्यास शेतकऱ्यांचे आर्थिक स्थैर्य आबाधीत राखण्याच्या दृष्टीने मदत व्हावी, त्यासाठी राज्यात प्राधान्याने पुर्नरचित हवामान आधरित फळपिक विमा योजना सन २०१९-२० राबविण्यात येत आहे. विविध हवामान धोक्यांमुळे फळपिकाच्या उत्पादकतेवर विपरीत परीणाम होऊन मोठ्या प्रमाणावर उत्पादनामध्ये घट येते. पर्यायाने शेतकऱ्यांना अपेक्षीत उत्पादन न मिळाल्याने आर्थिक संकटाला तोंड द्यावे लागते. या सर्व बाबींचा विचार करुन शेतकऱ्यांना फळपिक नुकसान भरपाई मिळण्यासाठी एक उपाय म्हणुन पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजना सन २०१९-२० संत्रा, मोसंबी, काजू, डाळिंब, आंबा, केळी व द्राक्ष (आंबिया बहार) या ७ फळपिकांसाठी जिल्हयामध्ये महसूल मंडळ हा घटक धरुन राबविण्यात आली आहे.

प्रधानमंत्री पीक विमा योजनेतंर्गत पुर्नरचित हवामान आधरित फळपिक विमा योजना सन २०१९-२० मध्ये राबविण्यासाठी संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. योजनेत सन २०१९-२० आंबिया बहारासाठी भारतीय कृषि विमा कंपनीने मागणी केल्यानुसार राज्य हिस्सा अनुदानाची मागणी कृषी आयुक्तालयाने सादर केली आहे. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजना सन २०१९-२० (आंबिया बहार) अंतर्गत कृषि आयुक्तालयाने सादर केलेली मागणीचा विचार करता त्यानुसार भारतीय कृषि विमा कंपनीस **रक्कम रु.२८४,४१,९२,७०५/-** इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत बाबीवर होणरा खर्च खालील लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा**

**(००) (०७) हवामान आधारित फळपीक विमा योजना राज्य हिस्सा**
**(२४०१ ९४०२) ३३-अर्थसहाय्य**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना मधील मार्गदर्शक सुचनांनुसार खर्च करण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र.अनै.संदर्भ क्र: १२९/२०२०/व्यय-१ दि.२१/०७/२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०३१४४५४२३९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

BALASAHE
B K RASKAR

Digitally signed by BALASAHEB K RASKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454a
c5c700ad6e2a7ad0b3115db, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=2cf78d68ceeac33ca63c8a2f2b360ebf1c6ac7
7c6a1ad4c5bfb24951806af0a8, ou=AGRICULTURE DIARY
AND FISHERTES DEPT, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=BALASAHEB K RASKAR
Date: 2020.08.03 14:56:22 +05'30'

**(बा.कि.रासकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११.वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई- ३२
१२.उप सचिव (११-अे /२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१३.कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४.विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३
१५.निवड नस्ती (कार्यासन १०-अे)